**सन २०२३ मधील रब्बी हंगामामधील राज्य ते तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेते शेतकऱ्यांना बक्षीसांची रक्कम अदा करण्यासाठी रु.३०.०० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-पुरस्कार-२०२४/प्र.क्र.८४/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२
दिनांक - १८ मार्च, २०२५

**संदर्भ:-**

१) पीक स्पर्धा नियमावली पुस्तिका जानेवारी २००२
२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पीकस्पर्धा-२०२२/प्र.क्र.११३/४अे, दि.२० जुलै, २०२३
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२४/प्र.क्र.८४/४अे, दि.१६ सप्टेंबर, २०२४
४) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र जा.क्र./विप्र-४/पिकस्पर्धा / रब्बी २३/ निधी मागणी/३९३५/ २०२५, दि.२१ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये पिकांची उत्पादकता वाढविण्यासाठी शेतकऱ्यांकडून विविध प्रयोग करण्यात येतात व उत्पादकतेत वाढ करण्याच्या प्रयत्न केला जातो. अशा प्रयोगशील शेतकऱ्यांना, प्रोत्साहन देऊन गौरव केल्यास त्यांची इच्छाशक्ती, मनोबल यांमध्ये वाढ होऊन त्यांच्याकडून आणखी उमेदीने नवनवीन अद्यावत तंत्रज्ञानाचा वापर केला जातो. कृषि उत्पादनामध्ये भर घालण्यासाठी शेतकऱ्यांचे योगदान मिळते. तसेच त्यांचे मार्गदर्शन परिसरातील इतर शेतकऱ्यांना होऊन राज्याच्या एकूण कृषि उत्पादनात मोलाची भर पडते, हा उद्देश ठेऊन राज्यांतर्गत पीकस्पर्धांचे आयोजन करण्यात येते. पीक स्पर्धा योजनेतील निकषांमध्ये कालानुरुप बदल करण्याची आवश्यकता लक्षात घेवून संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये राज्यातर्गत अनधान्य, कडधान्य व गळीतधान्य पिकांच्या पिकस्पर्धेच्या अंमलबजावणी कार्यपध्दतीमध्ये बदल करण्यात आले आहेत.

सन २०२४-२५ या वर्षामध्ये सन २०२०, २०२१ व २०२२ या वर्षांच्या विविध कृषि पुरस्कार वितरण सोहळयासाठी रु.७१५.६१ लाख व सन २०२३-२४ च्या खरीप हंगामामधील पीकस्पर्धा विजेत्या शेतकऱ्यांच्या बक्षिसांकरिता रु.९५.०५ लाख असे एकूण रु.८१०.६६ लाख निधी संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

रब्बी हंगाम २०२३ मधील राज्य ते तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेत्यांना बक्षिस रक्कम अदा करण्यासाठी रु.५३.३० लाख निधीची आवश्यकता आहे. एकूण बक्षिस रक्कम रु ५३.३० लाख मधून सद्यस्थितीत आयुक्तालय स्तरावरील शिल्लक रक्कम रु. २३.३० लाख वगळता उर्वरित रु ३०.०० लाख निधी उपलब्ध करून देण्याची विनंती कृषी आयुक्तालयाने संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये केली आहे. त्याअनुषंगाने रु.३०.०० लाख निधीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :-

१. रब्बी हंगाम २०२३ मधील राज्य ते तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेते शेतकऱ्यांना बक्षीसांची रक्कम अदा करण्यासाठी रु.३०.०० लाख (रुपये तीस लाख फक्त) निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

२. रब्बी हंगाम २०२३ मधील राज्य ते तालुका स्तरावरील पीकस्पर्धा विजेते शेतकऱ्यांना बक्षीस रक्कम अदा करण्याकरिता सदर निधी पुढील लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

(२४०१- पीक संवर्धन
१०९- विस्तार व शेतकऱ्यांचे प्रशिक्षण
१०९ (०१)(०३) पीक स्पर्धा
५०- इतर जमा
**(२४०१ ०७५३)** विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा सत्कार

३. या शासन निर्णयान्वये वितरीत रु.३०.०० लाख निधीचे कोषागारातून आहरण व वितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | विभाग स्तर | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक | संबंधित विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी |
| ३ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |
| ४ | तालुका स्तर | तालुका कृषी अधिकारी | तालुका कृषी अधिकारी |

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी खर्च करताना, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या, तसेच, नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्तीचे तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१८१६११०५३००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUCHITA RANJAN PIMPLE

Digitally signed by RUCHITA RANJAN PIMPLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=4d2e14e1b5b622285a319d549438716bc45686280aac03bea60829e714c19298, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E83BB07DDF0C67032F513E6336E3EE49F53DC047998C7012096DD9C8059D5FE, cn=RUCHITA RANJAN PIMPLE
Date: 2025.03.18 16:16:06 +05'30'

**(रुचिता पिंपळे)**
**कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, (कृषि), महाराष्ट्र राज्य.
५. प्रधान सचिव,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
८. कृषि संचालक, (सर्व) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. विभागीय कृषि सहसंचालक, सर्व
१०. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
११. तालुका कृषि अधिकारी, सर्व
१२. निवड नस्ती-४अे